सेवा पुस्तक

दुसरी प्रत

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग,**

**परिपत्रक क्रमांक सेवापु-१०८७/७७४/सेवा-९,**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २८ एप्रिल १९८७.**

## परिपत्रक

सेवा पुस्तक किंवा सेवा पत्रक [ Service Rolls ] अद्यावत ठेवावे व त्याची दुसरी प्रत कर्मचाऱ्यास द्यावी अशी तरतूद महाराष्ट्र नागरी सेवा [सेवेच्या सर्वसाधारण शर्ती] नियम, १९८१ च्या नियम ३६ मध्ये करण्यात आली आहे. परंतु बऱ्याच कार्यालयांत सेवा पुस्तक / सेवा पत्रकाची दुसरी प्रत कर्मचाऱ्यास, विशेषत: चतुर्थ श्रेणीच्या कर्मचाऱ्यांस देण्यात येत नाही, असे शासनाच्या निदर्शनास आणण्यात आले आहे. रजा, वेतनातील वाढ, निवृत्तिवेतन, निलंबन, बडतर्फी, शिक्षा, इत्यादी महत्त्वाच्या सेवाविषयक बाबींची नोंद सेवापुस्तकात असते व त्याबाबत कर्मचाऱ्यांनी अत्यंत जागरूक राहणे आवश्यक असते. ही गोष्ट लक्षात घेता, सेवा पुस्तक / सेवा पत्रकाची दुसरी प्रत कर्मचाऱ्यांस देण्याच्या व ती अद्यावत ठेवण्याच्या बाबतीत नियमांतील तरतुदीचे महत्त्व दिसून येईल. म्हणून प्रत्येक कार्यालयाने ज्या कर्मचाऱ्यांना सेवा पुस्तकाची / पत्रकाची दुसरी प्रत अजून दिली नसेल तर तशी ती विनामूल्य द्यावी. तसेच कर्मचाऱ्यांकडील ह्या दुसऱ्या प्रती ठराविक कालांतराने त्यांच्याकडून घ्याव्यात आणि मूळ सेवा पुस्तकातील नोंदींनुसार कर्मचाऱ्यास अद्यावत व साक्षांकित करून द्याव्यात. या बाबतीत तक्रारीस जागा राहणार नाही याची दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

बा. म. सावंत,
कक्ष अधिकारी,
वित्त विभाग.

प्रति

१ महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
२ महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
३ महालेखापाल [वैज्ञानिक व वाणिज्य], मुंबई,
४ अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५ संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
६ निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
×७ सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

[कृ. मा. प.

शासमु-रोटा-वित्त-स्व-१५८(१०,०००-१०-५-८७)

× ८. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
× ९. प्रबंधक, मूळ न्याय शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई,
× १०. प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
× ११. मुख्य लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
१२. मुख्य मंत्र्यांचे सचिव,
१३. राज्यपालांचे सचिव,
१४. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहाय्यक,
१५. विभागीय आयुक्त, मुंबई / पुणे / औरंगाबाद / नागपूर / नाशिक / अमरावती,
१६. मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
१७. मंत्रालयीन सर्व विभाग,
१८. निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
१९. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२०. वित्त विभागातील सर्व कार्यासने.

---

× पत्राने.

स्प- १४८[ ९०. ३३० + ३-१-८७)-I.